**मराठवाडा मुक्ती संग्राम लढयात शहिद झालेल्या स्वातंत्र्य योद्ध्यांच्या स्मृती प्रित्यर्थ मौजे उदगीर, तोंडचीर, कौलखेड, ता. उदगीर, जि. लातूर व मौजे. घोणसी व तिरुका, ता. जळकोट, जि. लातूर येथे बांधलेल्या हुतात्मा स्मारकांच्या दुरुस्तीकरिता निधी वितरण....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२४/प्र.क्र.१०९/स्वासैक-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२५.

**संदर्भ**: १. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, लातूर यांचे पत्र क्र. जिनिस / हुतात्मा स्मारक /२०२४-२५/ किप/ कार्या-१/१३१८, दि.११.०७.२०२४
२.शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. संकीर्ण २०२४/प्र.क्र.१०९/स्वासैक-१, दि.३०.०९.२०२४

**प्रस्तावना** :-

शासन निर्णय, दि.३०.०९.२०२४ अन्वये मराठवाडा मुक्ती संग्राम लढयात शहिद झालेल्या स्वातंत्र्य योद्ध्यांच्या स्मृती प्रित्यर्थ मौजे उदगीर, तोंडचीर, कौलखेड, ता. उदगीर, जि. लातूर व मौजे. घोणसी व तिरुका, ता. जळकोट, जि. लातूर येथे बांधलेल्या हुतात्मा स्मारकांच्या दुरुस्तीसाठी व याकरिता खर्च भागविण्यासाठी रु.७२५.७६ लक्ष (रुपये सात कोटी पंचवीस लक्ष शहात्तर हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

मौजे उदगीर, तोंडचीर, कौलखेड, ता. उदगीर, जि. लातूर व मौजे. घोणसी व तिरुका, ता. जळकोट, जि. लातूर येथे बांधलेल्या हुतात्मा स्मारकांच्या दुरुस्तीसाठी पुरवणी मागणी प्रस्ताव सादर करण्यात आला असता, सन २०२५ च्या महाराष्ट्र विधीमंडळाच्या अर्थसंकल्प अधिवेशनामध्ये रु.५०,००,०००/- (रु.पन्नास लक्ष फक्त) इतका निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठवाडा मुक्ती संग्राम लढयात शहिद झालेल्या स्वातंत्र्य योद्ध्यांच्या स्मृती प्रित्यर्थ मौजे उदगीर, तोंडचीर, कौलखेड, ता. उदगीर, जि. लातूर व मौजे. घोणसी व तिरुका, ता. जळकोट, जि. लातूर येथे बांधलेल्या हुतात्मा स्मारकांच्या दुरुस्तीसाठी खालील अटींच्या अधिन राहून रु.५०,००,०००/- (रु.पन्नास लक्ष फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, लातूर यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर निधी दि.३१ मार्च, २०२५ पुर्वी निश्चितपणे खर्च करण्याबाबत जिल्हाधिकारी, लातूर व तहसिलदार (सर्वसाधारण), जिल्हाधिकारी कार्यालय, लातूर यांनी दक्षता घ्यावी.

आ) ढोबळ स्वरुपात करण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक तयार करुनच काम हाती घ्यावे.

इ) सदर बांधकामासाठी खर्च करताना विहित कार्यपध्दतीचे अनुपालन करण्याची दक्षता घ्यावी.

ई) सार्वजनिक बांधकाम नियमावली व महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभागाने यापुर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

उ) प्रस्तुत बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित केलेल्या मानकानुसार, विहित दर्जाचे व गुणवत्तेचे राहिल, याकरिता जिल्हाधिकारी, लातूर यांनी नियतकालीक तपासणी करुन घेणे आवश्यक राहील.

ऊ) ज्या उद्दिष्टासाठी निधी मंजूर केला आहे, त्याच उद्दिष्टासाठी निधी खर्च करावा. तसेच, सदर वितरित निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, लातूर यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

२. सदर निधी खर्च करण्यासाठी जिल्हाधिकारी, लातूर यांना नियंत्रक अधिकारी व तहसिलदार (सर्वसाधारण), जिल्हाधिकारी कार्यालय, लातूर(सांकेतांक क्रमांक ३७०१०००९४८) यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी जिल्हाधिकारी, लातूर यांना अदा करण्यासाठी सह सचिव / उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, स्वातंत्र्य सैनिक कक्ष, मंत्रालय, मुंबई (A००१३) हे नियंत्रक अधिकारी राहतील.

४. जिल्हाधिकारी, लातूर यांना वितरीत करण्यात येणाऱ्या निधीतून खर्च केलेल्या रकमांचा ताळमेळ महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२ नागपूर यांचेकडे विहित कालावधीत करुन खर्चमेळाचा मासिक अहवाल शासनास नियमितपणे सादर करावा.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्रमांक - ए-४ २०५९, सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, ५३- परीक्षण व दुरुस्ती (००) (०१) हुतात्मा स्मारकाचे परीक्षण व निगा (अनिवार्य) २७-लहान बांधकामे (२०२५ ००१५) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२५४/२०२५/व्यय-४, दि.२५.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३२७१७१७२८४१०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAGYASHREE
RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FB84FEFEFE4EE219C1BC35B35201C14EAB0903E8194A7413A74EED93F32AFDB0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2025.03.27 17:18:41 +05'30'

**(भाग्यश्री भाईडकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री (वित्त विभाग) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा.संसद सदस्य.
८. सर्व मा.विधानमंडळ सदस्य, विधानभवन मुंबई.
९. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई.
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र २, नागपूर.
१४. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
१५. जिल्हाधिकारी, लातूर.
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.
१७. सामान्य प्रशासन विभाग, का.२५, मंत्रालय, मुंबई.
१८. क.अ. वित्त विभाग, (अर्थ संकल्प १३ / व्यय-४) मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती/स्वासैक-१.